संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांचे अधिपत्याखालील सहायक व्यवस्थापक, सामान्य राज्य सेवा गट "ब" या पदावरील सरळसेवेने नियुक्ती....
श्री . केतन कृष्णकांत लाड (अराखीव पदासाठी)

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक- नियुक्ती -२०१५/प्र.क्र. १५२/उद्योग-४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक- मुलेसा-२०१२/प्र.क्र. ११९/१२/उद्योग-४, दिनांक १६ मार्च, २०१३
२) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, यांचेकडील मुळ अर्ज क्रमांक ३५६/२०१३ मध्ये दिनांक १०/९/२०१४ रोजी पारीत केलेले आदेश.
३) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, यांचेकडील मुळ अर्ज क्रमांक ३५६/२०१३ मधील रिव्हीव अप्लीकेशन क्रमांक ३३/२०१४ मध्ये दिनांक ३०/१/२०१५ रोजी पारीत केलेले आदेश.
४) कक्ष अधिकारी, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक ९५०/१०८/आठ, दिनांक २०/६/२०१५

**शासन निर्णय,**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दिनांक २०/६/२०१५ रोजीच्या पत्रान्वये शिफारस केल्यानुसार श्री. केतन कृष्णकांत लाड (अराखीव असलेल्या पदासाठी) यांची सहायक व्यवस्थापक, सामान्य राज्य सेवा गट-ब, वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००, ग्रेड पे रु. ४,६००/- व नियमानुसार त्यावर प्राप्त होणारा महागाई भत्ता व इतर भत्ते या वेतनश्रेणीतील पदावर नेमणूक करुन त्यांची पदस्थापना, "सहायक व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे" या पदावर करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, यांचेकडील मुळ अर्ज क्रमांक ३५६/२०१३ मध्ये दिनांक १०/९/२०१४ रोजी पारीत केलेले आदेश तसेच महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, यांचेकडील मुळ अर्ज क्रमांक ३५६/२०१३ मधील रिव्हीव अप्लीकेशन क्रमांक ३३/२०१४ मध्ये दिनांक ३०/१/२०१५ रोजी पारीत केलेले आदेश विचारात घेऊन दिनांक २०/६/२०१५ रोजीच्या पत्रान्वये श्री. केतन कृष्णकांत लाड यांची आता शासनास शिफारस केली आहे. असे असले तरी आगायोच्या शिफारसीनुसार श्री. लाड यांचा गुणवत्ता क्रमांक, यापुर्वी उपरोक्त अ. क्र. १ येथील दिनांक १६/३/२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सहायक व्यवस्थापक गट-ब या पदावर पदस्थापना देण्यात आलेल्या श्री. मनोहर वैद्य व श्री. सचिन रहिभाऊ केदार या दोन उमेद्वारांच्या वर राहील.

३. श्री. केतन कृष्णकांत लाड यांनी सदरचे आदेश प्राप्त झाल्यापासून ३० दिवसांच्या आत संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांचेकडे रुजु व्हावे व “सहायक व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे” या पदाचा पदभार स्विकारावा, अन्यथा त्यांची नेमणुक रद्द करण्यात येईल.

४. संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांनी श्री. केतन कृष्णकांत लाड यांना रुजु करुन घेतल्यानंतर व पदस्थापना स्विकारल्यानंतर त्याबाबचे आदेश निर्गमित करावेत. जर ते विहित कालावधीत रुजु झाले नाहीत तर तसा अहवाल पुढील कार्यवाहीसाठी शासनास पाठवावा.

५. श्री. लाड हे ज्या दिनांकापासून पदभार स्विकारतील त्या दिनांकापासून ते पहिली दोन वर्षे परिविक्षा कालावधीवर राहतील. सदरचा परिविक्षाधीन कालावधी संपल्यानंतर पहिली वेतनवाढ त्यांना देय राहील. तथापि नंतरच्या वेतनवाढी मात्र परिविक्षा कालावधी यशस्वीपणे पूर्ण झाल्यानंतर देय राहतील. श्री. लाड यांचे परिविक्षा कालावधीतील वेतन शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार निश्चित करण्यात यावे. परिविक्षा कालावधीत त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास आणि विहित वेळेत विभागीय परिक्षा उत्तीर्ण न झाल्यास आणि अशा तऱ्हेने त्यांचे काम व वर्तणूक अयोग्य आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

६. त्यांना सेवेचा/पदाचा राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी कमीत कमी एक महिन्याची पूर्वसुचना शासनास दिली पाहिजे. तसेच, त्यांना सेवेतून कमी करावयाचे झाल्यास शासन एक महिन्याची पूर्वसूचना त्यांना देईल. तथापि, त्यांच्या सेवेच्या कालावधीत दुवर्तन झाल्यास वा सेवाशर्तीचा त्यांनी भंग केल्यास पूर्वसुचनेचा कालावधी विचारात न घेता त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल.

७. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम ११ तसेच नियम १५ (४) मध्ये दिलेल्या तरतुदीनुसार श्री. लाड यांची वैद्यकिय तपासणी झाली असून अधीक्षक, गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई यांनी त्यांचे पत्र क्रमांक गोतेरु/वैद्य. मंडळ/वै.मं. चे प्रमाणपत्र/९५९२/२०१५, दिनांक ६/१०/२०१५ अन्वये शासनास वैद्यकिय प्रमाणपत्र सादर केले असल्याने श्री. लाड यांची पुन्हा वैद्यकिय तपासणी करुन प्रमाणपत्र सादर करण्याची आवश्यकता नाही.

८. सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक- चापअ-१००८/प्र.क्र. १२४/०८/१६-अ, दिनांक ९/१/२००९ मध्ये नमुद केल्यानुसार त्यांचे पोलिस विभागाकडून चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल त्या पदावर रुजु झाल्यापासून ६ महिन्याचे आत शासनास सादर करण्याच्या अधिन राहून सदरची नियुक्ती देण्यात येत आहे.

९. सहायक व्यवस्थापक, (गट-ब) या पदाचे सेवा प्रवेश नियम दिनांक २७/२/१९८१ च्या अधिसुचनेन्वये निश्चित करण्यात आले असून त्यानुसार....

१) या पदासाठी दोन वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी असेल.

२) या पदासाठी विहित केलेली विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा, जर अगोदर ती व्यक्ती त्या परीक्षा उतीर्ण झालेली नसेल तर किंवा तिला त्या परीक्षा उतीर्ण होण्यापासून सूट देण्यात आली नसेल तर, याबाबतीत करण्यात आलेल्या नियमानुसार, उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

३) या पदावर नियुक्ती करण्यात आलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोणत्याही ठिकाणी बदली करीता पात्र राहील.

१०. श्री. केतन कृष्णकांत लाड हे सध्या शासन सेवेत कार्यरत असल्याने त्यांना त्यांच्या पुर्वीच्या सेवा जोडून देणे, तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू करण्याबाबतचे आदेश, श्री. लाड यांनी संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामुग्री संचालनालय, मुंबई यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर केल्यानंतर वेगळ्याने यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१२३०४१५६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc0853019893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.10.27 12:32:05 +05'30'

**(वै. भू. लटके)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई
२) व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई
३) व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
६) सह सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) श्री. केतन कृष्णकांत लाड, बी/३१२, श्याम “बी” बिल्डींग, वृंदावन सोसायटी, ठाणे (पश्चिम), ४०० ६०१
१०) निवड नस्ती, उद्योग-४